अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्त व्यवस्था, शिर्डी यांना राज्यमंत्री पदाचा दर्जा देणे तसेच राज्यमंत्री दर्जा प्राप्त अध्यक्षांना द्यावयाच्या सेवा सुविधांबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सासंवि -१०२१ /१०२/प्र.क्र.२५१/का.सोळा**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १९ जानेवारी, २०२२.

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ-१०१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ.,दि.१३.०३.२०१२
२) महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग ४ ब मध्ये प्रसिध्द झालेली विधि व न्याय विभाग, अधिसूचना दि.१६.०९.२०२१.

**शासन निर्णय :-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या समितीच्या अध्यक्ष पदावर संदर्भाधीन अधिसूचना क्र. २ अन्वये श्री. आशुतोष अशोकराव काळे यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

२. श्री. आशुतोष अशोकराव काळे , अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांना या शासन निर्णयान्वये या शासन निर्णयाच्या दिनांकापासून राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात येत आहे.

३. श्री. आशुतोष अशोकराव काळे, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांना राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात आला असल्याने त्यांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून संदर्भ क्र. १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १३.०३.२०१२ मधील तरतुदीच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सोयीसुविधा अनुज्ञेय राहतील :-

| अ.क्र. | सोयीसुविधा | अनुज्ञेय |
|---|---|---|
| १ | मानधन | रु.७,५००/- दरमहा |
| २ | समितीच्या बैठकीस उपस्थित राहण्याकरिता बैठक भत्ता | रु.५००/- प्रती बैठक |
| ३ | निवासी दूरध्वनीवरील खर्च | प्रतीमहा रु. ३,०००/- पर्यंतच्या खर्चाची प्रतीपूर्ती |
| ४ | कार्यालयीन कामासाठी वाहन सुविधेवरील खर्च | अ) समितीने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतीवर्ष रु.७२,०००/- पर्यंत या मर्यादेत अनुज्ञेय राहील.<br>**किंवा**<br>ब)अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) समितीच्या कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल, यासाठी त्यांना दरमहा रु. १०,०००/- देय राहतील<br>**किंवा**<br>क) अ किंवा ब प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने दर साल १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाड्याने घेता येतील.<br>ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. |

| | | |
|---|---|---|
| ५ | वाहनावर लाल दिवा लावणे | अनुज्ञेय नाही. |
| ६ | संचालक मंडळाच्या बैठकीनिमित्त राहण्याची सोय व किरकोळ बाबी प्रित्यर्थ समितीने करावयाचा खर्च | अ) मुंबई येथे रु. ७५०/- प्रतीदिन<br>ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.५०० प्रतीदिन<br>क) राज्यातील इतर ठिकाणी रु.३५०/- प्रतीदिन |
| ७ | प्रवास भत्ता व दैनिक भत्ता | अ. समितीच्या कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधे व्यतिरिक्त प्रवासासाठी सार्वजनिक उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी यांना शासन निर्णय, वित्त विभाग प्रवास १०.१०/ प्र.क्र.२ / सेवा-५, दि.०३.०३.२०१० मधील परि.क्र.४ नुसार लागू असलेला प्रवासभत्ता व परि.क्र.९ नुसार लागू असलेला दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.<br>ब. हे भत्ते समितीच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील.<br>क. उपक्रमाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ समितीने राहण्याची जेवणाची सोय पुरविली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शा.नि.वि.वि.क्र.टी.आर.ए १०७७ /१५६ /सी /एसईआर - ५, दि.११.०८.१९७७ च्या परि. १२ प्रमाणे परिगणीत होतील. |
| ८. | सहायक कर्मचारीवृंद | कार्यालयीन कामकाजासाठी<br>अ) एक स्वीय सहाय्यक, ब)एक लिपिक, क)एक शिपाई यांची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्याव्यात. |
| ९ | दौऱ्यातील सुविधा | समितीच्या कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहिल व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतची प्रतिपूर्ती समिती करेल. |
| १० | निवासस्थान | समितीच्या अध्यक्षांना समितीच्या निधीमधून भाड्याने किंवा समितीच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. |
| ११ | कार्यालयीन जागा | समितीच्या मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. |
| १२ | शासकीय समारंभातील स्थान | शासकीय समारंभाच्या वेळी राज्यमंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहिल. |

| | | |
|---|---|---|
| १३ | वाहनावर राष्ट्रध्वज लावणे. | लावता येणार नाही. |
| १४ | अंगरक्षक, निवासी पोलीस, दूरध्वनी चालक, एस्कॉर्ट व मानवंदना | अनुज्ञेय नाही. |

४. श्री. आशुतोष अशोकराव काळे यांना राज्यमंत्री पदाचा दर्जा प्रदान करण्यात आल्याने, त्यासाठी द्यावयाच्या सोयी सुविधा यावर होणारा खर्च श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्या निधीतून अदा करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०११९१२१२१९८३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA PARAG SALUNKE

Digitally signed by SUNITA PARAG SALUNKE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9ee0eef2d14d407f36dd3610d7d17b19cc85c5da3c6493dd1b6379b15e3372e, serialNumber=8f3e3dd76ae275cc1afa0c0be4edf609c0420709b30d7478f9b8cff1b4acde7d, cn=SUNITA PARAG SALUNKE
Date: 2022.01.19 12:13:19 +05'30'

**( सुनिता साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव व विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. मा.श्री. आशुतोष अशोकराव काळे, अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
५. जिल्हाधिकारी , सर्व जिल्हे, महाराष्ट्र राज्य.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी .
७. निवड नस्ती का.१६.